राज्य सेवा मुख्य परीक्षा सन २०१६ मधील एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-४/अ अंतर्गत सहायक गट विकास अधिकारी गट-ब यांना नियमित पदस्थापना देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## ग्राम विकास विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मविसे-१०/प्र.क्र.३/२०१९/आस्था-३अ

बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ, मुंबई - ४०० ००१
तारीख: २७ ऑक्टोंबर,२०२१.

वाचा:

**१) सामान्य प्रशासन विभाग शासन अधिसूचना क्रमांकः एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.४९ /कार्या.१२, दिनांक १४ जुलै,२०२१.**

**२) सामान्य प्रशासन विभाग ,शासन पत्र क्रमांकः टीआरएन-०८२१/प्र.क्र.२२/सीपीटीपी-ब, दिनांक २४ ऑगस्ट,२०२१.**

**प्रस्तावना:**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत घेण्यात आलेल्या राज्यसेवा परीक्षा,२०१६ द्वारे निवड होऊन वनामती,नागपूर या प्रशिक्षण संस्थेमध्ये दाखल झालेल्या महाराष्ट्र विकास सेवेतील सहायक गट विकास अधिकारी,गट-ब या पदावरील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांची सेवाजेष्ठता, एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-४/अ अंतर्गत संदर्भीय क्र.२ येथील पत्रान्वये सामान्य प्रशासन विभागाने निश्चित केली आहे. त्या आधारे सदरील परिविक्षाधीन अधिकाऱ्यांना नियमित पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:**

सार्वजनिक सेवेच्या हितार्थ महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतूदींनुसार पदस्थापना करण्यास सक्षम असलेल्या प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने, खालील अधिकाऱ्यांच्या पदस्थापनेचे आदेश संदभीय क्र.१ येथील शासन अधिसूचनेतील तरतुदीनुसार महसुली विभाग वाटप करून त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर नियमित नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | अनुज्ञेय महसुली विभाग | नियमित नियुक्ती दिलेले पद व ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १. | श्री.गोपाळ उत्तमराव कल्हारे | अमरावती | सहायक गट विकास अधिकारी, पंचायत समिती, मारेगाव, जिल्हा परिषद, यवतमाळ. | रिक्तपदी |
| २. | श्री.स्वप्नील भीमराव मेश्राम | नागपूर | सहायक गट विकास अधिकारी (ग्रामपंचायत),जिल्हा परिषद,नागपूर | रिक्तपदी |

२. उपरोक्त परिविक्षाधीन अधिकाऱ्यांनी त्यांच्या नियमित पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. विहित कालावधीत (पदग्रहण अवधी वगळता) पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यास टाळाटाळ केल्यास अथवा रजेवर गेल्यास अथवा नियुक्तीत बदल करून घेण्यासाठी अशासकीय व्यक्तींमार्फत शासनावर दबाव आणल्यास त्यांच्याविरुद्ध शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात येईल, याची नोंद घ्यावी. तसेच जिल्हा संलग्नतेच्या टप्प्यावर अपूर्ण राहिलेल्या प्रशिक्षणापैकी उर्वरित प्रशिक्षण हे उमेदवार वाटप करण्यात आलेल्या महसुली विभागातील ज्या जिल्ह्यात रुजू होतील त्या जिल्ह्यामध्ये पूर्ण करून घेण्यात यावे.

३. उपरोक्त अधिकाऱ्यांनी नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर व्हावे व पदभार स्विकारल्याचा दिनांक शासनास कळवावा. संबंधित अधिकारी हे विहित कालावधीत नियुक्तीच्या पदावर रुजू न झाल्यास संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी विभागीय आयुक्तांमार्फत शिस्तभंग विषयक कार्यवाहीचा प्रस्ताव शासनास सादर करावा.

४. सदर अधिकाऱ्यांचे माहे नोव्हेंबर,२०२१ पासूनचे वेतन नियमित नियुक्ती दिलेल्या जिल्हा परिषदा/पंचायत समित्या/सबंधित नियुक्ती कार्यालयाने अदा करावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२७१६४८०२१२२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pawar Sanjay Rajaram

Digitally signed by Pawar Sanjay Rajaram
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a00eeebdc51e1ffb7d6747ffbcbbba333cca001d95359cbb1a2217118b054a9e, serialNumber=65afd54f6450ab9da3327c361bfc1f5f92e629b78ed9a49381d3c9751f71254a, cn=Pawar Sanjay Rajaram
Date: 2021.10.27 17:44:03 +05'30'

( संजय पवार )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत-
१. मा. मंत्री ( ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३. अपर मुख्य सचिव (ग्राम विकास विभाग), ग्राम विकास विभाग,बांधकाम भवन,मुंबई.
४. विभागीय आयुक्त,अमरावती/नागपूर.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती/नागपूर.
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, अमरावती/नागपूर.
७. महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
८. संबंधित अधिकारी (द्वारा संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद)
९. निवड नस्ती-आस्था ३अ.